**गुणवंत मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतीगृह, मिरज जि. सांगली या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१८/प्र.क्र.२८७ /बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १४ जानेवारी, २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीसीएच-२००२/ प्र.क्र.३०१/ मावक-४, दि.१७/६/२००३.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ शिक्षण/ बांधकामे/ गुणवंत मु.शावगृ, मिरज, जि.सांगली/.इ.बांध./का-५/२०१८-१९/२९८६, दिनांक २०/८/२०१८

प्रस्तावना :-

राज्यातील मागासगर्वीय विद्याथी गुणवत्ताधारक व्हावेत यासाठी राज्यातील एकूण २८ ठिकाणी नवीन गुणवंत शासकीय वसतीगृह सुरु करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेण्यातआला आहे. त्यामध्ये सांगली येथील वसतीगृहाचा समावेश आहे. त्यानुसार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सादर केलेल्या गुणवंत मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतीगृह, मिरज सांगली या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सादर केलेल्या रुपये १३,०२,०४,००८/- (रुपये तेरा कोटी दोन लक्ष चार हजार आठ फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी गुणवंत मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतीगृह, मिरज, जि. सांगली या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या रुपये १३,०२,०४,००८/- (रुपये तेरा कोटी दोन लक्ष चार हजार आठ फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनाकडे पाठविले आहे. उपरोक्त अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तांत्रिक बाबींची छाननी व प्रशासकीय सहमतीकरीता पाठविण्यात आले असता सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार गुणवंत मुलांचे शासकीय वसतीगृह, मिरज जि. सांगली या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या रू.१२,५९,८१,५५२/- (अक्षरी रूपये बारा कोटी एकोणसाठ लक्ष एक्याऐंशी हजार पाचशे बावन्न फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपपत्रकास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अ) काम सुरू करण्यापूर्वी  नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे

ब) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करून काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१. दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई)  सदर अंदाजपत्रकास अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे साक्षांकन आवश्यक आहे. तसेच उपभोक्ता विभागाच्या वतीने प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,पुणे यांचे साक्षांकन आवश्यक आहे.

उ) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

२. गुणवंत  मुलांचे शासकीय वसतीगृह, मिरज जि. सांगली या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करुन ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग सांगली यांनी तात्काळ करावी. ई-निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर, ई-निविदा प्रक्रियेची सर्व कागदपत्रे सामाजिक न्याय विभागाकडे (उपभोक्ता विभाग) दायित्व मंजूरीसाठी पाठविण्यात यावीत. सामाजिक न्याय विभागाची अंतिम मान्यता झाल्यानंतरच बांधकामाबाबतची पुढील कार्यवाही करण्यात यावी.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाने छाननीअंती Recapitulation Sheet प्रमाणे प्रस्तावित करण्यात आलेल्या रू.१२,५९,८१,५५२/- (अक्षरी रूपये बारा कोटी एकोणसाठ लक्ष एक्याऐंशी हजार पाचशे बावन्न फक्त)  इतकी रक्कम परिगणीत करण्यात आली  असून Recapitulation Sheet पुढीलप्रमाणे आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| **Name of the Department : SOCIAL JUSTICE DEPTT.** | | | |
| **Name of Work : Construction of Government Hostel of Backward Boys students (Capacity-100 Students) at Miraj Dist. Sangli** | | | |
| **RECAPITULATION SHEET** | | | |
| **Sr. No.** | **Particulars of Items** | **Norms (Unit Rate Rs. per Sqmt./Meter/LumpSum etc.)** | **Cost Rs.** |
| (A) | ESSENTIAL ITEMS | | |
| 1 | **Building Proper (Scope)**<br>ground floor 1199.15 Sq.mt<br>first floor 1182.44 sq.mt<br>(d) **Cost of Construction** | 26400 per sqmt. | 6,28,73,976<br>-<br>**6,28,73,976** |
| 2 | **Electrification**<br>Internal<br>External | 5% of 1 (d)<br>6% of 1 (d)<br>**Total** | 31,43,699<br>37,72,439<br>**69,16,137** |
| 3 | **Water Supply and Sanitation** | 5% - of 1 (d) | **31,43,699** |
| 4 | **Miscellaneous Items** | | |
| | Green Building | | 62,87,397 |
| | Furniture | | 1,19,07,950 |
| | Rain Water harvesting and plantation | Lump Sum | 3,00,000 |
| | Fire Fighting Arrangements | Lump sum | 70,000 |
| | Compound wall and gate | | 39,26,000 |
| | Under Ground Tank,Fire tank, septic tack etc. | | 15,00,000 |
| | Street Light | Lump sum | 3,00,000 |
| | | **Total** | **2,42,91,347** |
| | **Sub Total (A) = (1)+(2)+(3)+(4)** | | **9,72,25,159** |
| **(B)** | **OPTIONAL ITEMS** | | |
| Sr. | water Main, Storage and pump house | Lump sum | 20,00,000 |
| | Transformer | | 7,50,000 |
| | solar water | | 4,75,000 |
| | land scape/gardening | | 3,00,000 |
| | land scape/gardening | | 3,00,000 |
| | water pump and bore well | - | 4,00,000 |
| | **subtotal (B)** | | **42,25,000** |
| | **PROJECT (A) + (B) (T)** | | **10,14,50,159** |
| | **Add 4% for Contingencies on (d)** | | **25,14,959** |
| | **Add 12% for GST on (T)** | | **1,21,74,019** |
| | **Add 10% for Escalation on (T)** | | **98,42,415** |
| | **TOTAL COST OF PROJECT** | | **12,59,81,552** |
| | **Say Rs. Lakhs** | | **1260.00** |

४.     या वर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनां अंतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५.     प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११४१४५६५९५१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2019.01.14 15:08:33 +05'30'

( अ.कों. आहिरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,सांगली.
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सांगली.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सांगली.
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,पुणे.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, सांगली.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सांगली.
१०)निवडनस्ती.